**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात प्रमाणपत्र सादर न केलेल्या किंवा अवैध ठरलेल्या राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत..**



**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. ग्रासअ-०२२५/प्र.क्र.२६/ग्रा.स.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:-** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दिनांक ३०/०६/२०२०

(३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ अे/१६-ब, दिनांक १४/१२/२०२२

(४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी ११२३/प्र.क्र.२९/आरक्षण-२, दिनांक ०४/१०/२०२४

(५) जा.क्र.राआ/महा/आस्था/अ.ज.जा.वै./२०२४/५७२५, दि. २४/०१/२०२५ रोजीचा राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचा प्रस्ताव.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९ अन्वये मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र.८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदीश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दिनांक ६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी आणि मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दिनांक २८/९/२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा अधिकारी / कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदांवर अधिकारी / कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याची सूचना दिली आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या प्रत्येक ११ महिन्याच्या सेवेनंतरचा १ दिवसाचा तांत्रिक खंड सर्व सेवा विषयक (पदोन्नती व अनुकंपा धोरण वगळून) व सेवा निवृत्ती विषयक लाभांसाठी क्षमापित करण्यात आला आहे.

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील गट-ब (राजपत्रित) संवर्गातील श्री. हे.बु.बोकडे, प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अति. नागपूर यांनी विशेष मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र सादर केल्याने, गट-ब अराजपत्रित संवर्गातील श्री. वसंत जनार्दन कोळी, लघुलेखक (नि. श्रेणी), जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अहिल्यानगर यांनी अनुसूचित जमातीचा दावा सोडून दिल्याने आणि गट-क संवर्गातील श्री. दे.बा.हेडाऊ, सहायक अधीक्षक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अमरावती यांनी विशेष मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र सादर केल्याने त्यांचेकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ /१६-ब, दिनांक ३०/६/२०२० अन्वये मा. सर्वोच्च न्यायालयाचे सिव्हील अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका मध्ये दिनांक ०६/०७/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची व मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दिनांक २८/०९/२०१८ च्या आदेशाची अंमलबजावणी करण्याकरीता "अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. यासंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना दिल्या आहेत. त्यानुसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गट-ब (राजपत्रित) संवर्गातील श्री. हे.बु.बोकडे, प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अति. नागपूर यांनी विशेष मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र सादर केल्याने, गट-ब अराजपत्रित संवर्गातील श्री. वसंत जनार्दन कोळी, लघुलेखक (नि. श्रेणी), जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अहिल्यानगर यांनी अनुसूचित जमातीचा दावा सोडून दिल्याने आणि गट-क संवर्गातील श्री. दे.बा.हेडाऊ, सहायक अधीक्षक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अमरावती यांनी विशेष मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र सादर केल्याने उक्त अधिकारी / कर्मचारी यांचेसाठी त्यांच्या सध्याच्या आस्थापनेवर ०३ (तीन) अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत असून, श्री. बोकडे, श्री. कोळी आणि श्री. हेडाऊ यांच्या सेवा या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात येत आहेत.

२. सदर अधिसंख्य पदावर कार्यरत अधिकारी / कर्मचारी श्री.बोकडे, श्री.कोळी आणि श्री. हेडाऊ यांना संदर्भ क्र.३ मधील शासन निर्णयानुसार प्रथम ११ महिन्यांकरीता व प्रत्येक वेळी १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन पुन्हा ११ महिन्यांच्या कालावधीकरिता अशाप्रकारे त्यांच्या सेवा सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत सुरू ठेवाव्यात, यामध्ये त्यांना पदोन्नती व अनुकंपा धोरणाचा लाभ मिळणार नाही.

३. श्री. हे.बु.बोकडे, प्रबंधक, श्री. वसंत जनार्दन कोळी, लघुलेखक (नि. श्रेणी) आणि श्री. दे.बा.हेडाऊ, सहायक अधीक्षक हे अधिसंख्य पदावर कार्यरत असेपर्यंत त्यांच्या वेतन व भत्त्यांवर होणारा खर्च संबंधित कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागवावा.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०२२११७२७४९६५०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA DAGADU FATE

Digitally signed by PRADNYA DAGADU FATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=a848319143424ef222d686b2c55b1a6e0d81ab1491664293c31d122b6ed5db02, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=36E36169CC745B209AD8A11BCA00BFC33087D53E6BD16ACAC9DB647D10CB4F63, cn=PRADNYA DAGADU FATE
Date: 2025.02.21 17:28:54 +05'30'

**(प्रज्ञा दगडू फटे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
५. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय.
७. प्रधान सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई.
९. प्रबंधक (प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई.
१०. प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अति. नागपूर.
११. प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अमरावती.
१२. प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अहिल्यानगर.
१३. संबंधित अधिकारी / कर्मचारी.
१४. निवडनस्ती.